“कुंडल ॲकॅडमी ऑफ डेव्हलपमेंट, ॲडमिनीस्ट्रेशन ॲण्ड मॅनेजमेंट (फॉरेस्ट)” तथा “कुंडल विकास, प्रशासन व व्यवस्थापन प्रबोधिनी (वने)” या अकादमीमधील पदनामांत बदल करणेबाबत.

महाराष्ट्र शासन
महसूल व वन विभाग,
शासन निर्णय क्रमांक : एफडीएम-२०१२/प्र.क्र.१०२/फ-२
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,
दिनांक :- २३ जुलै, २०१४

**वाचा** :- १) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र. ईएसटी-२०१०/प्र.क्र.६३/फ-९, दि.२३.०३.२०१०
२) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र. एफडीएम-२०१०/प्र.क्र.३९/फ-२, दि.२४.०६.२०११
३) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र. ईएसटी-२०१२/प्र.क्र.७४/फ-९, दि.०५.०५.२०१२
४) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र. ईएसटी-२०१२/प्र.क्र.२९९/फ-९, दि.२७.११.२०१२
५) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र.वनबा-२०१३/प्र.क्र.१५२/फ-९, दि.२९.०७.२०१३
६) शासन निर्णय, महसूल व वन विभाग क्र. एफडीएम-२०१२/प्र.क्र.१०२/फ-२, दि.०७.०२.२०१४.
७) शासन शुध्दीपत्रक, महसूल व वन विभाग क्र. एफडीएम-२०१२/प्र.क्र.१०२/फ-२, दि.१२.०२.२०१४.
८) मुख्य वनसंरक्षक (शिक्षण व प्रशिक्षण), पुणे यांचे पत्र क्र.कक्ष-१/कुंडल/३७३/२०१४-१५, दि.१७.०६.२०१४.
९) मुख्य वनसंरक्षक (शिक्षण व प्रशिक्षण), पुणे यांचे पत्र क्र.कक्ष-१/कुंडल/३८२/२०१४-१५, दि.१८.०६.२०१४.

**प्रस्तावना :-**

संदर्भ क्र.१ वरील दिनांक.२३.०३.२०१० च्या शासन निर्णयाअन्वये मौजे कुंडल, ता.पलुस, जि.सांगली येथे वन विभागाच्या जागेवर नविन प्रशिक्षण केंद्र निर्मितीच्या इमारत बांधकामासाठी रूपये १२,३९,६४,३००/- ला प्रशासकीय मान्यता देण्यात आली होती. तसेच संदर्भ क्र.२ वरील दि.२४.०६.२०११ च्या शासन निर्णयाअन्वये वन प्रशिक्षण केंद्र कुंडल यांचेसाठी २३ पदांना मंजूरी देण्यात आलेली आहे. त्याचबारोबर संदर्भ क्र.६ वरील दि.०७.०२.२०१४ च्या शासन निर्णयान्वये वन प्रशिक्षण संस्था, कुडल या वन प्रशिक्षण केंद्राचा दर्जा वाढवून त्याचे राज्य वन अकादमीमध्ये रुपांतर करण्यात येऊन त्यास वन विभागाची प्रमुख प्रशिक्षण संस्था “कुंडल फॉरेस्ट ॲकॅडमी ऑफ ॲडमिनीस्ट्रेशन डेव्हलपमेंट ॲण्ड मॅनेजमेंट” असे नामकरण करुन १५ नवीन पदांची निर्मिती व ५ पदे बाहय यंत्रणेद्वारे भरण्याची मंजूरी देण्यात आली होती. याशिवाय, “कुंडल फॉरेस्ट ॲकॅडमी ऑफ ॲडमिनीस्ट्रेशन डेव्हलपमेंट ॲण्ड मॅनेजमेंट”

याऐवजी "कुंडल ॲकॅडमी ऑफ डेव्हलपमेंट, ॲडमिनीस्ट्रेशन ॲण्ड मॅनेजमेंट (फॉरेस्ट)" तथा "कुंडल विकास, प्रशासन व व्यवस्थापन प्रबोधिनी (वने)" असे नामकरण संदर्भ ७ वरील दि.१२.०२.२०१४ च्या शासन शुध्दीपत्रकाअन्वये करण्यात आलेले आहे.

आता, मुख्य वनसंरक्षक (शिक्षण व प्रशिक्षण), पुणे यांनी संदर्भ क्र. ८ वरील दि.१७.०६.२०१४ च्या पत्रान्वये, दि.२४.०६.२०११ च्या शासन निर्णयातील प्राचार्य या पदाचे पदनाम अपर संचालक (प्रशासन) असे करण्याबाबत तर, दि.०७.०२.२०१४ च्या शासन निर्णयातील निदेशक या पदाचे पदनाम संचालक आणि अपर निदेशक या पदाचे पदनाम अपर संचालक (प्रशिक्षण) असे करण्याबरोबरच दि.१८.०६.२०१४ च्या पत्रान्वये दि.०७.०२.२०१४ च्या शासन निर्णयातील रोखपाल या पदाचे पदनाम लेखापाल (रोखपाल) असे करण्याची विनंती केलेली आहे.

**शासन निर्णय :-**

मुख्य वनसंरक्षक (शिक्षण व प्रशिक्षण) ,पुणे यांच्या दि.१७.०६.२०१४ च्या पत्रातील विनंती विचारात घेता "कुंडल ॲकॅडमी ऑफ डेव्हलपमेंट, ॲडमिनीस्ट्रेशन ॲण्ड मॅनेजमेंट (फॉरेस्ट)" तथा "कुंडल विकास, प्रशासन व व्यवस्थापन प्रबोधिनी (वने)" या अकादमीमधील खालील पदे सुधारीत रकान्यामध्ये दर्शविल्याप्रमाणे वाचावीत असे शासन आदेश देण्यात येत आहे.

| अ. क्र. | शासन निर्णयाचा दिनांक व त्यामधील पदाचा अनुक्रमांक | पूर्वीचे पदनाम | सुधारीत पदनाम |
|---|---|---|---|
| १ | शासन निर्णय दि.२४.०६.२०११ पद क्रमांक.१ | प्राचार्य (विभागीय वन अधिकारी) | अपर संचालक (प्रशासन) |
| २ | शासन निर्णय दि.०७.०२.२०१४ पद क्रमांक.२ | निदेशक | संचालक |
| ३ | शासन निर्णय दि.०७.०२.२०१४ पद क्रमांक.५ | अपर निदेशक | अपर संचालक (प्रशिक्षण) |
| ४ | शासन निर्णय दि.०७.०२.२०१४ पद क्रमांक.१२ | रोखपाल | लेखापाल (रोखपाल) |

उपरोक्त पदांच्या पदनामात केलेल्या बदलामुळे शासनावर भविष्यात कोणताही प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष खर्चाचा अतिरिक्त भार येणार नाही या अटीच्या अधिन राहून वित्त विभागाने सदर पदांच्या पदनामात बदल करण्यास त्यांच्या अनौपचारीक संदर्भ क्र.२०१/२०१४/व्यय-१०, दि.१६.०७.२०१४ अन्वये दिलेल्या मान्यतेच्या अनुषंगाने सदर शासन निर्णय निर्गमित करण्यात येत आहे.

हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०१४०८०४१६३०१८९३१९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Nandkumar Maruti Shilwant

Digitally signed by Nandkumar Maruti Shilwant
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Nandkumar Maruti Shilwant
Date: 2014.08.04 16:28:41 +05'30'

(नं. मा. शिलवंत)

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत :-**

१) मा.राज्यपाल यांचे सचिव,
२) मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,
३) मा.उपमुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव.
४) अपर मुख्य सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
५) अपर मुख्य सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
६) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वनबल प्रमुख), महाराष्ट्र राज्य, नागपूर
७) प्रधान मुख्य वनसंरक्षक (वन्यजीव)/(उत्पादन व व्यवस्थापन), महाराष्ट्र राज्य, नागपूर
८) प्रधान मुख्य वनसंरक्षक व महासंचालक, सामाजिक वनीकरण, पुणे.
९) प्रधान मुख्य वनसंरक्षक (संशोधन, शिक्षण व प्रशिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे.
१०) सर्व अपर प्रधान मुख्य वनसंरक्षक, म.रा., नागपूर/पुणे/मुंबई.
११) मुख्य वनसंरक्षक (शिक्षण व प्रशिक्षण), महाराष्ट्र राज्य, पुणे.
१२) सर्व मुख्य वनसंरक्षक / सर्व वनसंरक्षक / उपवनसंरक्षक,
१३) सर्व मंत्रालयीन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१४) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/ लेखापरीक्षा)-१/२, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
१५) कोषागार अधिकारी, जिल्हा कोषागार यांचे कार्यालय, सांगली/कोल्हापूर.
१६) सर्व मा.मंत्री/मा.राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
१७) मा.मंत्री (वने) यांचे खाजगी सचिव / मा. राज्यमंत्री (वने) यांचे खाजगी सचिव
१८) निवडनस्ती, फ-२ कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२